**राज्यातील मायक्रोफायनान्स कंपन्यांच्या विनातारण कर्ज वाटपाबाबत चौकशी करण्यासाठी प्रशासकीय समितीची स्थापना करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांक : लवेसु-१२१६/प्र.क्र.४/शिकाना/पोल-१३

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०३ ऑगस्ट, २०१७

**वाचा :-**

१) शासन निर्णय, गृह विभाग क्र.लवेसु- १२१६/प्र.क्र.४/शिकाना/पोल-१३, दि.१२.०४.२०१७
२) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र जा.क्र. स्वीय सहा./वि.आ. नागपूर/ का.वि.-६३/२०१७, दिनांक- ०५.०७.२०१७.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त वाचा येथील संदर्भाधीन शासन निर्णयान्वये राज्यातील मायक्रोफायनान्स कंपन्यांनी विनातारण दिलेल्या कर्ज प्रकरणांची चौकशी करण्यासाठी प्रशासकीय समितीची स्थापना करण्यात आली आहे. सदर प्रशासकीय समितीस आपला चौकशी अहवाल शासनास सादर करण्यासाठी ६० दिवसांची (दिनांक १२ जून , २०१७ पर्यत) मुदत दिली होती. तथापि, सदर प्रशासकीय समितीचे अध्यक्ष विभागीय आयुक्त, नागपूर यांनी त्याच्याकडे असलेला कामकाजाचा व्याप व त्यांचेकडील बाकीच्या समित्यांचे कामकाज व त्यांचा प्राधान्यक्रम या बाबीमुळे त्यांनी सदर प्रशासकीय समितीस चौकशी अहवाल शासनास सादर करण्यासाठी सप्टेंबर, २०१७ पर्यत मुदतवाढ देणेबाबत व विभागिय आयुक्त, अमरावती यांना सदर प्रशासकीय समितीमध्ये सह अध्यक्ष करणेबाबत विनंती केली आहे.

**शासन निर्णय:-**

राज्यातील मायक्रोफायनान्स कंपन्यांनी विनातारण दिलेल्या कर्ज प्रकरणांची चौकशी करण्यासाठी विभागीय आयुक्त, नागपूर यांच्या अध्यक्षतेखाली शासन निर्णय क्रमांक लवेसु-१२१६/प्र.क्र.४/शिकाना/पोल-१३, दिनांक १२ एप्रिल, २०१७ अन्वये प्रशासकीय चौकशी समितीची स्थापना करण्यात आली आहे.

सदर प्रशासकीय समितीमध्ये विभागीय आयुक्त, अमरावती यांची सह अध्यक्ष म्हणून नेमणूक करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. तसेच, सदर प्रशासकीय समितीस चौकशी अहवाल शासनास सादर करण्यासाठीचा कालावधी दिनांक १२ जुन, २०१७ रोजी संपुष्टात आला असल्यामुळे सदर शासन निर्णयान्वये सदर समितीस दिनांक ३० सप्टेंबर, २०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०८०११५१८३०८७२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Yuvraj B Ajetrao

Digitally signed by Yuvraj B Ajetrao
DN: CN = Yuvraj B Ajetrao, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home Department
Date: 2017.08.03 17:50:00 +05'30'

**( युवराज अजेटराव )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.विरोधी पक्ष नेते यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधान परिषद / विधानसभा
४) सर्व मा. मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५) मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव
६) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, (महसुल व वन विभाग, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, महिला व बालविकास विभाग, वित्त विभाग) मंत्रालय, मुंबई.
७) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८) विभागिय आयुक्त, नागपूर.
९) विभागिय आयुक्त, अमरावती.
१०) सर्व पोलीस पोलीस महानिरिक्षक
११) संचालक, जनसंपर्क व माहिती संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२) सर्व जिल्हाधिकारी.
१३) सर्व पोलीस अधीक्षक/ पोलीस आयुक्त.
१४) निवडनस्ती पोल-१३.